**गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत सन २०१७-१८ या वर्षामधील दि.०१.१२.२०१७ ते ०७.१२.२०१७ खंडीत कालावधीतील प्राप्त झालेले दावे निकाली काढण्यासाठी विशेष बाब म्हणून मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक शेअवि-२०१८/प्र.क्र. १८६/११-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक-२८ फेब्रुवारी, २०२०.

**संदर्भ :-** १) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१७/प्र.क्र.१८१/११-अे, दि.५.१२.२०१७.
२) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१७/प्र.क्र.१८१/११-अे, दि.५.१२.२०१७.
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०१८/प्र.क्र.३२/सां.९/३५४/२०१८,दि. ३.१०.२०१८
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०१७/प्र.क्र.३२/सां.९/६९/२०२०,दि. १०.०२.२०२०

**प्रस्तावना :-**

सन २०१७-१८ मध्ये गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना चालु ठेवण्यासाठी संदर्भाधिन क्र (१) येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून संदर्भाधिन क्र. (२) अन्वये सदर योजना सन २०१७-१८ मध्ये राबविण्याबाबत वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना सन २०१७-१८ या वर्षासाठी दि.०१.१२.२०१७ ते ३०.११.२०१८ या कालावधीसाठी लागू करणे आवश्यक होते. तथापि, प्रशासकीय कारणास्तव प्रस्तुत योजना दि.०१.१२.२०१७ पासून लागू होवू शकली नाही व ती दि.०८.१२.२०१७ पासून सुरु करण्यात आली. कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र (३) व (४) अन्वये प्रस्तावित केल्यानुसार गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेअंतर्गत दि.०१.१२.२०१७ ते ०७.१२.२०१७ या खंडीत कालावधीमध्ये प्राप्त झालेले प्रस्ताव निकाली काढण्यासाठी शासनस्तरावरुन विशेष बाब म्हणून मंजूर करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत दिनांक १.१२.२०१७ ते दिनांक ०७.१२.२०१७ या कालावधीत प्राप्त विमा दावे शासनस्तरावरुन विशेष बाब म्हणून मंजूर करण्यास याव्दारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. या कालावधीतील प्राप्त विमा दावे मंजूर करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. या कालावधीतील दावे तपासून त्यांच्या पात्र / अपात्रतेबाबत सखोल व काळजीपूर्वक छाननी शासन नियुक्त विमा सल्लागार कंपन्यांनी करावयाची आहे.

४. विमा सल्लागारांनी तपासणी करुन तयार केलेल्या यादीप्रमाणे दाव्यांची रक्कम अदा करण्यापूर्वी खालील अधिकाऱ्यांच्या समितीने यादीची फेरतपासणी करावी.

| | | |
|---|---|---|
| १) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे | - | अध्यक्ष |
| २) कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, म.रा., पुणे | - | सदस्य |
| ३) संबंधित विमा सल्लागार कंपनीचे प्रतिनिधी | - | तांत्रिक सल्लागार |
| ४) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, म.रा., पुणे | - | सदस्य सचिव |

या समितीने प्रकरणाच्या पात्र / अपात्रतेबाबत घेतलेला निर्णय अंतिम राहिल.

५. या निर्णयानुसार लाभार्थींना शासन निर्णय क्र. शेअवि-२०१७/प्र.क्र.१८१/११-अे, दि.५.१२.२०१७ नुसार शेतकऱ्याचा मृत्यु झाल्यास रुपये २ लाख व अंपगत्व आल्यास प्रकरणपरत्वे रुपये १ लाख ते रुपये २ लाख याप्रमाणे नुकसान भरपाई रक्कम मिळेल. दाव्यासाठी वा विमा लाभाच्या पात्रतेसाठी सदर शासन निर्णयातील अटी व शर्ती बंधनकारक असून त्याप्रमाणे कागदपत्रांची पूर्तता आवश्यक असेल.

६. या प्रकरणी अदा करावयाच्या रक्कमेबाबत पात्र विमा दाव्यांना मंजूरी देण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं क्रमांक अनौसं क्र.२५९/१४३१ दि.१२.१२.२०१८ व अनौ.संदर्भ क्र ३१२/वि.वि./व्यय-१दि.१४.१२.२०८. अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२००२२८१४३८०२८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Neeta Eknath Shinde

Digitally signed by Neeta Eknath Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2bffd6992498e56663024368c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, serialNumber=f325d659f47933958aa2d98f394db95f94be57548776492ba36e77ea1c4aa53b, cn=Neeta Eknath Shinde
Date: 2020.02.28 14:45:20 +05'30'

**(निता शिंदे)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७. सर्व मा.विधानसभा सदस्य
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य

९. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
१०.सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११.सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१२.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.उप सचिव, (११-अे व २-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१५.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१७.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
१९.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), मुंबई.
२०.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखावअनुज्ञेयता), मुंबई
२१.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), नागपूर
२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखावअनुज्ञेयता),नागपूर
२३.संचालक, लेखावकोषागारे, मुंबई
२४.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२५.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२६.मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
२७.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८. सर्व तहसिलदार
२९.सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
३०.सर्व तालुका कृषि अधिकारी
३१.निवडनस्ती, कार्यासन ११-अे.